मौजे देवरी, रेवसा, पुसदा व देवरा ता. जि. अमरावती या गावठाणातील पूर पुनर्वसित भागासाठी प्रशासकीय मान्यता प्राप्त अंतर्गत रस्ते /नालीचे बांधकाम करणे या नागरी सुविधा कामांकरिता निधी मंजूरीबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एलएफडी-२०१९/प्र.क्र.२६(२)/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: २९ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आव्यप्र-२१००/प्र.क्र.९७/आव्यप्र-२, दि.०२/०९/२०१४

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांकः एलएफडी-२०१९/प्र.क्र.२६/र-१२, दि.११/०९/२०१९

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांकः एलएफडी-२०१९/प्र.क्र.२६/र-१२, दि.३१/०३/२०२१

४) शासन शुध्दीपत्रक क्र. एलएफडी-२०१९/प्र.क्र.२६/र-१२, दि.१०/०८/२०२२

५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५

६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६

७) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र. पूर-पुनर्व/अका/कावि-५७/२०२३, दि.२१/०२/२०२३

प्रस्तावना -

अमरावती जिल्हयातील सन २००७ मधील अतिवृष्टी / पुरामुळे बाधित झालेल्या गावांचे पुनर्वसन व घरांची पुनर्बांधणी करण्याचा निर्णय दि.०२/०९/२०१४ च्या शासन आदेशान्वये घेण्यात आला आहे. तसेच पुनर्वसित भागात नागरी सुविधा कामांना संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर नागरी सुविधेचे कामाकरिता जिल्हाधिकारी, अमरावती यांनी दि.१५/०३/२०२१ च्या पत्रान्वये शासनास निधी मागणी प्रस्ताव सादर केला होता. त्याअनुषंगाने अंतर्गत रस्ते /नालीचे बांधकाम करणे या नागरी सुविधा कामासाठी संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये रु.३७.१४ लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. तथापि जिल्हाधिकारी, अमरावती यांनी दि.२१/०२/२०२३ च्या पत्रान्वये सदरचा निधीचा विनियोग करण्यात आला नसल्याने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये विनियोग करण्यासाठी परवानगी देण्याबाबत विनंती केली आहे. तद्नुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार मौजे देवरा व देवरी या गावातील अंतर्गत रस्ते व नाली बांधकाम या नागरी सुविधेच्या कामासाठी मंजूर निधीपैकी रु.६,००,०००/- (रुपये सहा लक्ष फक्त) इतक्या निधीचा खाली नमूद पूर पुनर्वसित गावांना विनियोग करण्यास विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत संबंधित कार्यन्वयन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद यांना खालील अटींच्या अधिन राहून परवानगी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पुनर्वसित गांव | नागरी सुविधा कामाचा तपशील | प्रशासकीय मान्यता | सन २०२१-२२ मधील अखर्चित निधी नमूद केल्यानूसार विनियोगास मान्यता |
|---|---|---|---|---|
| १ | देवरी | अंतर्गत रस्ते / नाली बांधकाम करणे | ३२,००,०००/- | ३,००,००० |
| २ | देवरा | अंतर्गत रस्ते / नाली बांधकाम करणे | ७२,१८,०००/- | ३,००,००० |

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित कार्यन्वयन यंत्रणेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत/ कार्यारंभ आदेशान्वये निविदा प्रक्रिया पूर्ण करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, अमरावती व जिल्हाधिकारी, अमरावती यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी ज्या मंजूर नागरी सुविधा कामाकरीता आला आहे त्याच कामासाठी खर्च करण्यात यावा. सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही व निश्चित केलेल्या कालावधीत कामे पूर्ण होईल. तसेच मंजूर निधी शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षांतर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते ) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

५) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

६) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

७) संबंधित कार्यन्वयन यंत्रणेने या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत

८) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२२-२३ मध्ये सन २०२१-२०२२ मध्ये अखर्चित राहिलेल्या निधीच्या विनियोगास परवानगी देण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

२. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

३. मौजे देवरी, रेवसा, पुसदा व देवरा ता. जि. अमरावती येथील पुनर्वसित भागातील अंतर्गत रस्ते / नाली बांधकाम करणे या नागरी सुविधेच्या कामासाठी शासन निर्णय दि.३१/०३/२०२१अन्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेला व कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जि. प. अमरावती यांचेकडे अखर्चित राहीलेल्या रु.३७.१७ लक्ष निधीपैकी उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मौजे देवरी व देवरा या पुनर्वसित गावाकरीता विनियोग करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सदर निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना BEAMS प्रणालीवर तातडीने उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही महसूल व वन विभागाच्या म-११ कार्यासनाने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९०९४९४६८६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.03.29 09:59:00 +05'30'

(चु. रा. निखारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
२. जिल्हाधिकारी, अमरावती
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ / नागपूर-२
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१ / नागपूर-२
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, जिल्हा परिषद, अमरावती
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
८. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९, अर्थ संकल्प -६, मंत्रालय, मुंबई
९. महसूल व वन विभाग, कार्यासन म-११ / ब -१ / पी ए सी, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती र-१२